अर्जुनी मोरगाव पंचायत समिती (जि.गोंदिया) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१५/प्र.क्र. ८७ /बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २३ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,गोंदिया यांचे पत्र क्र. जिपगों/ साबांवि/ तांशा-टि-२/४१००/२०१८, दि. ०३.११.२०१८

**प्रस्तावना :-**

१. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया यांनी वरील पत्रान्वये अर्जुनी मोरगाव पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. अर्जुनी मोरगाव पंचायत समिती जिल्हा गोंदिया येथील अस्तित्वातील इमारतीचे बांधकाम सन १९६१ मध्ये केलेले असून सदर इमारत अत्यंत जुनी असून तीची दुरुस्ती करणे शक्य नाही. सदर इमारतीत कार्यान्वीत असलेल्या विभागात काम करणाऱ्या अधिकारी व कर्मचारी यांना या जीर्णावस्थेत असलेल्या इमारतीपासून अपघात होऊ नये म्हणून सदर इमारत पाडून त्या ऐवजी नवीन प्रशासकीय इमारत बांधकाम करण्याकरीता पंचायत समितीने दिनांक ०७.०२.२०१२ रोजी ठराव क्र. २५/२ पारित केला आहे. सदर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यात येणाऱ्या जागेबाबत तहसिलदार अर्जुनी मोरगाव यांनी मंजूर केलेली आखीव पत्रिका पान क्र. ३५२, नगर भुमापन क्र.३५२, क्षेत्र २४९९८.५ चौ.मी. जिल्हा परिषदेने सादर केली आहे. अर्जुनी मोरगाव पंचायत समिती " क " वर्गात मोडते. " क " वर्ग दर्जानुसार बांधकामाकरीता १०२६ चौ.मी. बांधकाम मंजूर असलेल्या नमुना नकाशावर आधारीत सदर बांधकाम करण्यात येणार असून याकरीता, मुळ बांधकामासह विद्युतीकरण, पाणीपुरवठा, फायर फायटींग यंत्रणा, यासह बोअर वेल,पंप हाऊस, गॅरेज व फर्निचर सहीत एकूण रु. ३७०.०० लक्ष किंमतीचे २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारीत सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक उपअभियंता, कार्यकारी अभियंता(बांध), जिल्हा परिषद, गोंदिया यांनी साक्षांकीत केले आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया यांनी प्रस्तावासोबत पं.स.च्या ठरावाची प्रत, नमुना नकाशाची प्रत, जागेची आखीव पत्रीका, ले-आऊट प्लॅन, साईट प्लॅन, स्थळ दर्शक नकाशा, अस्तित्वातील इमारत बांधकामाचे फोटो इत्यादी कागदपत्रे सादर केली आहेत.

३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती अर्जुनी मोरगाव पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता एकूण रुपये ३७०.०० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

४. अर्जुनी मोरगाव पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्याकरीता एकूण रु. ३,७०,००,०००/- (रु. तीन कोटी सत्तर लक्ष फक्त) इतक्या सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) नियोजित अर्जुनी मोरगाव पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकाम विहित नमुना नकाशानुसार हाती घेताना स्थानिक नगर रचना प्राधिकरणाची तसेच, अग्निशामन यंत्रणेची मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजित अर्जुनी मोरगाव पंचायत समितीचे बांधकाम आखीव पत्रिका पान क्र. ३५२, नगर भुमापन क्र. ३५२, क्षेत्र २४९९८.५ चौ.मी. या जागेत करताना जागा पंचायत समितीच्या नावावर असल्याची खात्री करुन घ्यावी.

३) नियोजित अर्जुनी मोरगाव पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यात पदाधिकारी यांच्या दालनालगत महिला पदाधिकाऱ्यांसाठी प्रसाधनगृहा-सह विश्रांती कक्षाची व्यवस्था करण्यात यावी.

४) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाश योजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

५) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) अर्जुनी मोरगाव पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

७) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

८) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. या कामावर प्रशासकीय मान्यते पेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती / जिल्हा परिषदेने सोसावा.

९) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

५. अर्जुनी मोरगाव पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा मंजूर सर्वसाधारण गोषवारा खालील प्रमाणे आहे :-

| FINAL ABSTRACT FOR CONSTRUCTION OF ARJUNI MORGAO P.S. ADMIN., BLDG. | | |
|---|---|---|
| Sr.No. | Description of item | Cost Rs. |
| 1 | Cost Of Main Building (Civil work) | 21999205.00 |
| 2 | Add 11% for Electrification | 2419913.00 |
| 3 | Add 8 % for Water Supply and Sanitation | 1759936.00 |
| 4 | Add 2 % for Rain Water Harvesting and Fire Fighting | 439984.00 |
| 5 | Add for Bore Well & Pump House | 750000.00 |
| 6 | Add for Garage | 750000.00 |
| 7 | Add Furniture | 1500000.00 |
| 8 | Add for 6 % for Price Variation charges | 1319952.00 |
| | Total | 30938990.00 |
| 9 | Add for 12% GST | 3712679.00 |
| 10 | Add 1% S.Q.M. Charges | 309390.00 |
| 11 | Add 4% for Contingencies | 1237560.00 |
| 12 | Add 2 % for Computerization | 618780.00 |
| | Total | 36817398.00 |
| | Says Rs | 37000000.00 |

६. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

८. प्रस्तुत कामाची प्रगती वेळोवेळी कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१२२१११९४८८३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.23 12:53:08 +05'30'

( दि.बा.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो./ मु.मं.ग्रा.स.यो., पुणे
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
६) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
८) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद गोंदिया
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा गोंदिया
१०) गट विकास अधिकारी, पंचायत समिती अर्जुनी मोरगाव, जिल्हा गोंदिया
११) सभापती, पंचायत समिती अर्जुनी मोरगाव, जिल्हा गोंदिया
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, गोंदिया
१४) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, गोंदिया
१५) निवड नस्ती,कार्यासन बांधकाम-४ ,ग्रा.वि.वि.बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ फोर्ट, मुंबई